भाषा संचालनालयाच्या आस्थापनेवरील भाषा उप संचालक (अनुवाद व शब्दावली)- गट अ या संवर्गामधील अधिकाऱ्यांची दिनांक ०१.०१.२०२४ रोजीची तात्पुरती ज्येष्ठतासूची.

## महाराष्ट्र शासन
## मराठी भाषा विभाग
## शासन परिपत्रक क्रमांकः भाज्येसू-२०२१/प्र.क्र.२३/आस्था-२

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक: २६ जुलै, २०२४

वाचा -

१) सामान्य प्रशासन विभाग, अधिसूचना क्र. एसआरव्ही २०१६/प्र.क्र.२८१/१२, दि.२१.०६.२०२१
२) मराठी भाषा विभाग,शासन परिपत्रक, क्रमांक: भाज्येसू-२०२१/प्र.क्र.२३/आस्था-२, दि . १३.०६.२०२३

**शासन परिपत्रक**

भाषा संचालनालयातील भाषा उप संचालक (अनुवाद व शब्दावली) या संवर्गामधील अधिकाऱ्यांची दिनांक ०१.०१२०२२. ते दि.०१.०१.२०२३ य दोन वर्षांच्या कालावधीची अंतिम ज्येष्ठतासूची संदर्भ क्र.२ येथील परिपत्रकान्वये प्रसिद्ध करण्यात आली आहे. सदर परिपत्रकान्वये भाषा उप संचालक (अनुवाद व शब्दावली) गट अ, या एकाकी संवर्गाची दि.०१.०१.२०२४ रोजीची एका वर्षांची तात्पुरती ज्येष्ठतासूची या परिपत्रकान्वये प्रसिद्ध करण्यात येत आहे.

२. भाषा उप संचालक (अनुवाद व शब्दावली) गट अ, या एकाकी संवर्गामधील अधिकाऱ्यांची सदरहू तात्पुरती ज्येष्ठतासूची सामान्य प्रशासन विभाग, "महाराष्ट्र नागरी सेवा (ज्येष्ठतेचे विनियमन) नियमावली, २०२१", दिनांक २१.०६.२०२१ मधील तरतुदीनुसार खालील अटींच्या अधीन राहून प्रसिद्ध करण्यात येत आहे.

(अ) भाषा उप संचालक (अनुवाद व शब्दावली) या संवर्गात दिनांक ०१.०१.२०२३ ते दिनांक ३१.१२.२०२३ या कालावधीत संबंधित वर्षात नियमित/तदर्थ पदोन्नतीने/सरळसेवेने नियुक्त झालेल्या अधिकाऱ्यांच्या नावांचा समावेश करुन तसेच ३१.१२.२०२२ पूर्वी नियत वयोमानाने सेवानिवृत्त झालेल्या, स्वेच्छा निवृत्ती घेतलेल्या, निधन पावलेल्या अधिकाऱ्यांची नांवे संबंधित वर्षातून वगळून सदर संवर्गाची तयार केलेली तात्पुरती ज्येष्ठतासूची या परिपत्रकासोबतच्या विवरणपत्रात जोडली आहे.

ब) ज्येष्ठतासूचीतील अधिकाऱ्यांच्या नावासमोर नमूद केलेला ज्येष्ठतेचा दिनांक हा सामान्य प्रशासन विभाग, अधिसूचना क्र. एसआरव्ही २०१६/प्र.क्र.२८१/१२, दिनांक २१.०६.२०२१ नुसार फक्त भाषा उप संचालक (अनुवाद व शब्दावली) संवर्गातील ज्येष्ठता निश्चित करण्याकरिता विचारात घेण्यात येईल. सदर दिनांकाच्या अनुषंगाने आर्थिक लाभांची अनुज्ञेयता प्रचलित धोरणाच्या अधीन असेल.

क) मा. उच्च न्यायालय, मुंबई यांनी याचिका क्रमांक २७९७/२०१५ मध्ये दिनांक २५.०५.२००४ चा शासन निर्णय रद्द करुन पदोन्नतीमधील आरक्षण अवैध ठरविले आहे. सदर निर्णयास आव्हानित करण्यासाठी राज्य शासनाने मा. सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र. २८३०६/२०१७ मधील अंतिम निर्णयाच्या अधीन राहून सदरची तात्पुरती ज्येष्ठतासूची निर्गमित करण्यात येत आहे.

३. भाषा संचालक, भाषा संचालनालय, मुंबई यांना विनंती करण्यात येते की, सदर परिपत्रक व त्यासोबतची ज्येष्ठतासूची संबंधित भाषा उप संचालक (अनुवाद व शब्दावली) यांच्या (रजेवर असलेल्या/सेवानिवृत्त झालेल्या अधिकाऱ्यांसह) तात्काळ निदर्शनास आणाव्यात. तसेच सदर ज्येष्ठतासूचीबाबत काही आक्षेप असतील तर त्या बाबत संबंधितांचे आक्षेप १५ दिवसांत मागवून घेऊन ते भाषा संचालनालयाच्या स्तरावर तपासून संचालनालयाच्या अभिप्रायासह दिनांक १४.०८.२०२४ पर्यंत शासनास पाठवावेत. दिनांक १४.०८.२०२४ नंतर शासनास प्राप्त झालेल्या आक्षेपांचा विचार केला जाणार नाही तसेच सदर दिनांकापर्यंत कोणतेही आक्षेप शासनास प्राप्त न झाल्यास संबंधितांचे काहीही आक्षेप नाही असे गृहीत धरुन सदरची ज्येष्ठता सूची ही अंतिम जेष्ठतासूची स्वरुपात प्रसिद्ध करण्यात येईल याची कृपया नोंद घेण्यात यावी.

४. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०७२६१११६३८५७३३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VAISHALI LAHU WAGHMARE

Digitally signed by VAISHALI LAHU WAGHMARE
DN: CN = VAISHALI LAHU WAGHMARE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = MARATHI LANGUAGE DEPARTMENT
Date: 2024.07.26 11:32:47 +05'30'

**( वैशाली वाघमारे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. संबंधित भाषा उप संचालक (अनुवाद व शब्दावली) (भाषा संचालनालयामार्फ़त)
२. भाषा संचालक, भाषा संचालनालय, मुंबई.
३. निवडनस्ती.

विवरणपत्र

शासन परिपत्रक क्रमांक: भाज्येसू-२०२१/प्र.क्र.२३/आस्था-२, दिनांक २६/ ०७/२०२४ चे सहपत्र

| | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | संवर्गाचे नाव | भाषा उपसंचालक (अनुवाद व शब्दावली), गट-अ | | | | | | | |
| २ | वेतनश्रेणी | एस-२०: ५६१००-१७७५०० | | | | | | | |
| ३ | दिनांक ०१ जानेवारी २०२४ रोजीची तात्पुरती ज्येष्ठतासूची | | | | | | | | |
| | दिनांक ०१ जानेवारी २०२४ रोजीची तात्पुरती ज्येष्ठतासूची (दि. ०१.०१. २०२३ ते दि. ३१. १२. २०२३ या कालावधीत कार्यरत कर्मचाऱ्यांची) | | | | | | | | |
| नियम ३(२)(ब) नुसार ज्येष्ठता क्रमांक | शासकीय कर्मचाऱ्यांचे नाव | संबंधित पदावरील नियुक्तीचा मार्ग | जन्मदिनांक (दिनांक-महिना-वर्ष) | प्रवर्ग | नियम ३(२)(अ) नुसार संवर्गात प्रत्यक्ष रुजू दिनांक | ज्येष्ठतेचा दिनांक | सेवानिवृत्तीचा दिनांक (दिनांक महिना वर्ष) | शैक्षणिक अर्हता (ज्या पदासाठी आवश्यक आहे तेथेच हा रकाना भरावा) | शेरा |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० |
| १ | श्रीमती वि. ल. डोनीकर | पदोन्नती | २६.०९.१९६७ | खुला | ०५.११.२०१९ | ०५.११.२०१९ | ३०.०९.२०२४ | एम. ए. (मराठी) | तात्पुरती पदोन्नती |